**प्रशासकीय मान्यता-**
कोपरगांव, जि.अहमदनगर येथे अपर जिल्हा व सत्र न्यायालय व दिवाणी न्यायालय (वरिष्ठ स्तर)इमारत बांधण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
विधी व न्याय विभाग,
शासन निर्णय क्र. सीसीबी १००६/१२००/प्र.क्र.९४/का.१३.
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दि. ३१ ऑक्टोबर, २००७.

पहा :- १) अपर प्रबंधक, उच्च न्यायालय (निरीक्षणे), मुंबई यांचे पत्र क्र.बी(डब्ल्यू) ६०६५/१९८९, दि.१४ जुलै, २००६.
२) जिल्हा व सत्र न्यायालय, अहमदनगर यांचे पत्र क्र.एचकेडब्ल्यू/बीएलडी/२७४५/२००६, दि. १ एप्रिल, २००६.

**शासन निर्णय** :- कोपरगांव, जि.अहमदनगर येथे अपर जिल्हा व सत्र न्यायालय व दिवाणी न्यायालयाकरिता इमारत बांधावयाच्या रु.१,३१,५३,५००/- (रु.एक कोटी एकतीस लाख त्रेपन्न हजार पाचशे फक्त) इतक्या अंदाजित खर्चास (खाली नमुद केलेल्या विगतवारीनुसार) याद्वारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १ | इमारतीचा बांधकाम खर्च | ६९,९५,६७० |
| २ | ४% आकस्मिक खर्च | २,७९,८२६ |
| ३ | रेन वॉटर हार्वेस्टिंग | ३,००,००० |
| ४ | पाणीपुरवठा व मलनि:सारण ८% | ५,५९,६५३ |
| ५ | विद्युतीकरण ९% | ६,२९,६१० |
| ६ | अंतर्गत रस्ते | ५,००,००० |
| ७ | कंपाऊंड वॉल (१९२ रनिंग मिटर) | ३,६४,८०० |
| ८ | जमीन सपाटीकरण | १,००,००० |
| ९ | स्ट्रीट लाईट | १,००,००० |
| १० | सायकल स्टँड/स्कूटर स्टँड/पार्कींग | २,००,००० |
| ११ | पंप हाऊस व बोअरवेल | २,००,००० |
| १२ | बागबगीचा व हिरवळ पसरणे | १,००,००० |
| १३ | सोलार लाईट | २,००,००० |
| १४ | कार्यालयीन फर्निचर | ५,००,००० |
| १५ | फ्लॅग पोस्ट | २५,००० |
| १६ | डी.एस.आर.वरील १५% वाढ (सन २००५-०६ ते २००६-०७) | १०,४९,३५० |
| १७ | लिफ्ट चार्जेस | ३,५०,००० |
| १८ | १०% किंमतीतील वाढ | ६,९९,५६७ |
| | **एकूण** | **१,३१,५३,४७६ म्हणजेच १,३१,५३,५००** |

२. ही प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

" **प्रस्तुत इमारतीचे काम वास्तुशास्त्रज्ञ यांच्याकडून मांडणी नकाशा तयार करुन घेतल्यावरच सुरु करावे ".**

३. या प्रीत्यर्थ होणारा खर्च "मागणी क्र.एच-८, ४०५९-सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च-०१ कार्यालयीन इमारती-१०१ बांधकाम-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-प्रमुख बांधकामे-०३ न्यायदान" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. मात्र, **अर्थसंकल्पात तरतूद केल्याशिवाय कामास सुरुवात करण्यात येऊ नये.**

४. हे आदेश, सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक:- २०२/इमा-२, दि. ५.९.२००७, अनुसार त्या विभागाच्या सहमतीने आणि वित्त विभाग शासन निर्णय क्र. क्र मांक:-विअप्र १०००/प्र.क्र.४६/२००१/विनियम, दि.११ जुलै २००१ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग-पाच, अनुक्रमांक १, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र. १३४ अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये संबंधित सक्षम प्राधिका-यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

**( र. ग. पांचाळ )**
**कार्यासन अधिकारी,**
**विधी व न्याय विभाग, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

मा.राज्यपाल यांचे सचिव, महाराष्ट्र राज्य, राजभवन, मुंबई,
महाप्रबंधक, उच्च न्यायालय , मुंबई,
प्रबंधक (निरीक्षण), उच्च न्यायालय (अपिल शाखा) , मुंबई,
जिल्हा व सत्र न्यायाधीश, अहमदनगर
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखापरीक्षा) - एक, महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरीक्षा) , महाराष्ट्र-दोन, नागपूर,
अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, अहमदनगर,
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, अहमदनगर(मूळ अंदाजपत्रक व नकाशे),
उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग,कोपरगांव, जि.अहमदनगर,
जिल्हा कोषागार अधिकारी ,अहमदनगर,
उप कोषागार अधिकारी, अहमदनगर,
सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
महासंचालक , माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
कार्यासन-११ व १२, विधी व न्याय विभाग,मंत्रालय,मुंबई,
**निवड नस्ती.**